मौजे पेढेपरशुराम ता.दापोली, जि.रत्नागिरी येथील कमल तलाव संवर्धन प्रस्तावास राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: रासयो-२०१९/प्र.क्र.१६०/तां.क.२**
**मंत्रालय, मुंबई -४०० ०३२**
**दिनांक - ०३ फेब्रुवारी, २०२०**

**वाचा -**

१) या विभागाचा शा.नि. क्र. रासयो-२०१९/प्र.क्र.१६०/तां.क.२, दिनांक १८ सप्टेंबर, २०१९.

२) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. अर्थसं - २०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दिनांक ०८/०७/२०१९.

**प्रस्तावना -**

शासनाच्या दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचेकडून प्राप्त झालेला मौ. पेढेपरशुराम, ता. दापोली, जि. रत्नागिरी येथील कमल तलाव संवर्धनाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता सदर प्रस्तावास निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

राज्य सरोवर योजनेंतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांच्यामार्फत सादर मौ. पेढेपरशुराम,ता. दापोली, जि. रत्नागिरी येथील कमल तलावाचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी सविस्तर प्रकल्प अहवालानुसार संदर्भाधीन शासन निर्णयासोबत जोडलेल्या " प्रपत्र अ" मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रु. १,५१,७६,५१२/- (रुपये एक कोटी एकावन्न लक्ष शहात्तर हजार पाचशे बारा फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास संदर्भाधीन शासन निर्णयामधील " प्रपत्र ब" मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर मंजूर प्रस्तावाच्या एकूण रकमेपैकी ७०% हिस्सा राज्य शासन व ३० % हिस्सा अंमलबजावणी संस्थेकडून उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. सदर योजनेचा वित्तीय आकृतीबंध खालील प्रमाणे आहे-

| अ.क्र | हिस्सा | मंजूर निधी (रुपये) | अक्षरी मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १ | राज्य हिस्सा (७०%) | **१,०६,२३,५५८/-** | रूपये एक कोटी सहा लक्ष तेवीस हजार पाचशे अठावन्न फक्त |
| २ | अंमलबजावणी संस्थेचा हिस्सा (३०% ) | **४५,५२,९५४/-** | रूपये पंचेचाळीस लक्ष बावन्न हजार नऊशे चोपन्न फक्त |
| | एकूण | **१,५१,७६,५१२/-** | रुपये एक कोटी एकावन्न लक्ष शहात्तर हजार पाचशे बारा फक्त |

२. मौ. पेढेपरशुराम,ता. दापोली, जि. रत्नागिरी येथील कमल तलाव संवर्धन प्रस्तावाच्या राज्य हिश्श्यापोटी देय एकूण रू. १,०६,२३,५५८/- (अक्षरी रुपये एक कोटी सहा लक्ष तेवीस हजार पाचशे अठावन्न फक्त) पैकी प्रथम हप्त्यापोटी रू.५३,००,०००/- (अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

३. यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी (Chief Executive Officer, Zilla Parishad, Ratnagiri) यांचे नांवे रू.५३,००,०००/- (अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष फक्त) एवढया रकमेचा धनादेश काढण्यात यावा.

४. उपरोक्त अदा करावयाचे रू.५३,००,०००/- (अक्षरी रूपये त्रेपन्न लक्ष फक्त) अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून संबंधितांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीम. शिल्पा चं. शिर्के, कार्यासन अधिकारी, पर्यावरण विभाग व नियंत्रक अधिकारी म्हणून श्री. सु.कि. निकम, उप सचिव, पर्यावरण विभाग, मंत्रालय यांना घोषित करण्यात येत आहे.

५. सदर होणारा खर्च मागणी क्र. यू-३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदूषण व प्रतिबंध व नियंत्रण १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) ((०७), राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावी व तो सन २०१९-२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र. अर्थसं - २०१९/प्र.क्र.९२/अर्थ - ३, दिनांक ०८/०७/२०१९ रोजीच्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानूसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना मागील ३ महिन्यात कोणताही निधी मुक्त करण्यात आलेला नाही. तसेच मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांचेकडून पर्यावरण विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

८. शासनाच्या दिनांक १८ सप्टेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता करणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी यांना बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकतेस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२०५१५१३०२९५०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानूसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, street=ENVIRONMENT DEPARTMENT,15TH FLOOR,NEW ADMIN BLDG,MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=3a94a1f658a34d45ca2859dbc88dfb40760079b8946087ef0fb8bc7cd7314c27, ou=ENVIRONMENT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2020.02.05 15:48:19 +05'30'

**( सु.कि. निकम )**
**उप सचिव, पर्यावरण विभाग**

**प्रत,**

१. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन

१. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

२. मा. उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव

३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र १/२,मंबई/ नागपूर.

४. जिल्हाधिकारी, जिल्हा कार्यालय, रत्नागिरी

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी

६. अधिदान व लेखा अधिकारी, मंबई.

७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

८. मा.मंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.

९. मा.राज्यमंत्री, पर्यावरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.

१०.मा. प्रधान सचिव, पर्यावरण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई.

११.वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.

१२.नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.

१३.रोखशाखा, पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.

१४.निवडनस्ती.